# हत्ती आणि मगर

मैक्स

मराठी : अश्विनी बर्वे



बिचाऱ्या हत्तीला आपली शेजारीण मगरीचे संगीत ऐकण्याची मजबुरी होती. मगर दिवसरात्र आपल्या व्हायोलिनवर एकच धूनचा अभ्यास करत असे, तिची धून बिना लयीची असे. हे तोपर्यंत चाललं जोपर्यंत हत्ती तुतारी वाजवायला शिकला नाही. त्यानंतर मगरीला आपलं व्हायोलिन ऐकू येणं बिलकुल अशक्य झालं. पण लवकरच त्यांच्यात आपपसात समजोता झाला. त्यानंतर दोघांना आपल्या जीवनात अधिक सुख आणि सामंजस्य मिळाले. हे पुस्तक दोन भांडणाऱ्या शेजाऱ्यांची कडू कहाणी चांगले मांडते.





# हत्ती आणि मगर

मैक्स

मराठी : अश्विनी बर्वे





मगर एक संगीतकार होती. ती व्हायोलिन वाजवे. ती पूर्ण दिवस आणि रोज रात्री उशिरापर्यंत संगीताचा अभ्यास करे. त्यामुळे तिला खूप समाधान मिळे.

तथापि हे तिच्या शेजाऱ्यासाठी बिलकुल आनंददायी नव्हतं. एकच धून परत परत चुकीच्या स्वरामध्ये ऐकून हत्तीचे कान पिकून गेले होते.



मग एक दिवस तो हा आवाज सहन करू शकला नाही. तो तक्रार करण्यासाठी लगेच मगरीच्या घरी गेला.




पण मगर म्हणाली की ती एक संगीतकार आहे. “मी माझ्या संगीताशिवाय राहू शकत नाही!” तिने हत्तीला म्हटले. हत्ती उदास होऊव्न आपल्या घरी परत आला. त्या संध्याकाळी मगरीने परत आपलं व्हायोलिन वाजवलं. नेहमीसारखं बेसूर पद्धतीने तो रात्री उशिरापर्यंत वाजवत राहिला.



आणि मग हेच चालत राहिलं. मगर बेसूर पद्धतीने व्हायोलिन वाजवत राहिला आणि त्याने हत्तीचा पारा चढत राहिला. आता हत्ती वाचूही शकत नव्हता. तो झोपूही शकत नव्हता.



खरंतर, आता हत्तीच्या आयुष्यातला सगळा आनंद संपला होता आणि तो डॉक्टरकडे आपली समस्या घेवून गेला.

डॉक्टरांनी हत्तीला शांत ठिकाणी जाण्याचा सल्ला दिला आणि त्याबरोबर काही कडू औषधंही दिली. पण प्रत्येकवेळी हत्ती घरी जाई तेव्हा मगरीचे बेसूर संगीत त्याच्या कानावर वार करत..

मगरीसारखा  कलाकार होणं किती सोप्पं आहे, हत्तीने विचार केला.




आणि मग  अचानक, हत्तीच्या डोक्यात एक विचार आला. अच्छा, का नाही? कोणाला माहित, एखाद्यावेळेस माझ्या आतही एक संगीतकार लपलेला असेल.

हत्ती उत्साहित होवून शहरात गेला आणि आपल्यासाठी एक सुदंर  चमकदार पितळीची तुतारी घेवून आला. त्याला लहानपणापासून तुतारी वाजवायची होती.




त्याच संध्याकाळी हत्तीने अभ्यास करायला सुरुवात केली.

ओह, यात किती मजा आहे.

हत्ती आपल्या स्वतःच्या संगीताच्या कौशल्याने खूप हैराण झाला. तो रात्री उशिरापर्यंत तुतारी वाजवत राहिला.




मगरीने, जेव्हा अचानक आपल्या शेजारी एक भयानक आवाज ऐकला तेव्हा ती खूप हैराण झाली. त्यावेळी ती मोझार्टने रचलेल्या व्हायोलिन सोनाटाचा अभ्यास करत होती.

"हे काय चालू आहे?" ती रागाने ओरडली. ती तक्रार करण्यासाठी लगेच हत्तीकडे गेली.



"तो आवाज बंद कर!" मगरीने रागात म्हटले. "तू माझं संगीत बरबाद करत आहे,"

पण हत्ती घाबरला नाही.

"माझ्या प्रिय मगरे," तो म्हणाला. "मला क्षमा करा. बघ मी सुद्धा तुझ्यासारखा एक कलाकार आहे. मी पण तुझ्यासारखं वाजवल्याशिवाय राहू शकत नाही."



बिचारी मगर,आता संगीताचा अभ्यास करू शकत नव्हती. हत्तीच्या तुतारीचा आवाज खूप उंच होता.

मगरीला त्या आवाजात आपल्या व्हायोलिनचा आवाज ऐकू येत नव्हता.




दुसरीकडे हत्ती ठीक-ठाक आणि खुश होता.

आपल्या आतल्या संगीताचा शोधाने त्याला पूर्णपणे बद्दले होते.त्याने आपले केस वाढवले आणि चमकदार कपडे घातले ज्यामुळे लोकांचे त्याच्याकडे लक्ष जाईल.

आता त्याला आपल्या चमकदार पितळी तुतारी वाजवण्यात पहिल्यापेक्षा अधिक मजा येत होती.



त्याबदल्यात मगरीने दोन मोठी झाकणं एकमेकांवर आदळत जोरानेआवाज करत हत्तीचा आवाज बंद करण्याचा पूर्ण प्रयत्न केला.




याचा अर्थ असा झाला की हत्तीला तुतरीत पहिल्यापेक्षा जोरात फुंक मारावी लागली. आणि अशा पद्धतीने दोन्ही शेजारी एकमेकांना त्रास देत होते.





निराश होवून मगरीने आपलं हाईड्रोलिक ड्रील मशीन चालवून भयानक आवाज करायला सुरुवात केली.

हत्तीला तो आवाज सहन करणं खूप कठीण होतं. बिचारा हत्ती घाबरून फरशीवर पडला.



हत्तीला वाटलं यावेळी मगर आपल्या सीमा ओलांडून खूप पुढे गेली आहे.




मग हत्तीने आपला मोठा हातोडा घेतला आणि तो भिंतीवर परत परत आपटायला सुरुवात केली.



मोठ्या हातोड्याचा तो मार भिंत जास्त वेळ सहन करू शकली नाही. मग भिंत धाडकन तुटून खाली पडली.मग दोन्ही कलाकार एक-दुसऱ्याच्या समोर उभे राहिले आणि खूप हैराण झालेले दिसत होते.

“मला हे करायचं नव्हतं,” हत्ती खंत करत म्हणाला. “मी तुला एक कप चहा देवू शकतो का?”




मग दोन्ही शेजाऱ्यांनी मिळून चहा प्यायला आणि संगीतावरील आपल्या प्रेमाविषयी चर्चा केली.

“मला माहित आहे,” हत्ती म्हणाला. “आपण दोघं एकत्र मिळून संगीत का रचू शकत नाही?”

“किती चांगला विचार आहे!” मगर म्हणाली. मगरीने लगेच घरी जावून आपलं व्हायोलिन आणलं, जे ढिगाऱ्याखाली पडलं होतं.




मग त्या दोघांनी मिळून संगीताचा अभ्यास केला. दोघांची लय, धून एकदम बरोबर होती-एक, दोन, तीन, चार!

ते तासंतास संगीत वाजवत राहिले. ते आठवड्याभर संगीत वाजवत राहिले. ते संगीतात अधिकाधिक कुशल होत गेले. त्यांचं संगीत किती गोड होतं.




लवकरच ते आपल्या युगल गीतांसाठी जगभर प्रसिद्ध झाले.मग ते नेहमी एकमेकांच्या बरोबर आनंदाने राहू लागले.

त्यांनी ती तुटलेली भिंत परत बांधली नाही. कारण आता त्यांना तिची गरज नव्हती.




समाप्त